शासकीय वैद्यकिय महाविद्यालय सर्वोपचार रुग्णालय, बारामती या संस्थेस सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत मंजूर अनुदानातून यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांक : यंत्रख-२०२३/प्र.क्र.२१८/प्रशा-१,

गो.ते.रुग्णालय आवार,नवीन मंत्रालय, ९ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : २३ जून, २०२३

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : डीएमईआर-२२०११/१२३/२०२३-पीआरओसी१, दिनांक : ०९.०६.२०२३

**शासन निर्णय :**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकिय महाविद्यालय सर्वोपचार रुग्णालय, बारामती या संस्थेस राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून खालील तक्त्यात नमूद केलेली यंत्रसामुग्री व साधनसामुग्री टर्न की तत्वावर खरेदी करण्यास एकूण रुपये ४,३२,४७,०००/- (रूपये चार कोटी बत्तीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | लॉन्ड्री प्लांट विथ टर्न कि | १ | २,२५,००,००० | २,२५,००,००० |
| २. | किचन प्लांट विथ टर्न कि (५०० खाटांच्या रुग्णांकरीता) | १ | १,३३,४७,००० | १,३३,४७,००० |
| ३. | किचन प्लांट विथ टर्न की (विद्यार्थ्यांकरिता) | १ | ७४,००,००० | ७४,००,००० |
| | | | एकूण रुपये | ४,३२,४७,००० |

अटी :-

१) सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनेंतर्गत मंजूर अनुदानातून संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर यंत्रसामुग्री टर्न की तत्वावर खरेदी करावयाची असल्याने या विभागाचा शासननिर्णय क्रमांक - आएचएन-२०१९/प्र.क्र.२९३/प्रशा-१, दिनांक ०७ मार्च, २०१९ मधील कार्यपध्दती राबवून यंत्रखरेदी करण्यात यावी.

४) सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

५) सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक / पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित यंत्रसामुग्री साहित्याचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

८) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्रसामुग्रीच्या/ साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा-राज्ययोजनांतर्गत योजना |

| | | |
|---|---|---|
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांचे बळकटीकरण व दर्जा वाढ करणे व यंत्रसामुग्री |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

**३.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२३२१०३४९५८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.06.26 19:23:17 +05'30'

( सुधीर जया शेट्टी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
२) महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालय सर्वोपचार रुग्णालय, बारामती.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) निवडनस्ती (प्रशा-१).